सन २०२३-२४ साठी विभागीय/ जिल्हा/ तालुका क्रीडा संकुलांच्या परिरक्षणाकरीता निधी वितरीत करणेबाबत-
(लेखाशीर्ष-२२०४ ५३१२)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक-राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च,२००३.
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१, दि.२४.०१.२०२४.
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१, दि.१३.०२.२०२४.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.ताक्रीसं/देदु/निमा/निवि/२०२३-२४/का-९/५६७०,दिनांक २९.०२.२०२४ चे पत्र.
५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र संकीर्ण -२०२४/प्र.क्र.११/२०२४/कोषा प्रशा-५, दि.४.३.२०२४
६. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१, दि.१२.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य क्रीडा धोरण, २००१ अंतर्गत महाराष्ट्र राज्यामध्ये क्रीडाविषयक पायाभूत सुविधा निर्माण करणे, राज्यातील नागरिक व खेळाडूंना सराव, प्रशिक्षणासाठी विभाग, जिल्हा व तालुका स्तरावर क्रीडा संकुलांची स्थापना करण्यात आलेली आहे. या संकुलांच्या दैनंदिन परिरक्षणाकरीता/देखभाल व दुरुस्तीकरीता, संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयातील, परिच्छेद-२ व ६ मधील तरतूदीनुसार खालीलप्रमाणे परिरक्षण (देखभाल दुरुस्ती) निधी अनुज्ञेय आहे :-

| अ. क्र | संकुलाचा प्रकार | प्रथम वर्षाकरिता | द्वितीय वर्षाकरिता | तृतीय वर्षाकरिता |
|---|---|---|---|---|
| १ | विभागीय क्रीडा संकुल | १५.०० लाख | १२.५० लाख | १०.०० लाख |
| २ | जिल्हा क्रीडा संकुल | १०.०० लाख | ७.५० लाख | ५.०० लाख |
| ३ | तालुका क्रीडा संकुल | **प्रतिवर्षी ३.०० लाख** | | |

२. राज्यातील विभागीय/ जिल्हा / तालुका क्रीडा संकुलाच्या दैनंदिन परिरक्षणाकरीता/देखभाल दुरूस्तीकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता सुधारीत अंदाजानुसार जिल्हा क्रीडा संकुलाची मग ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टा अंतर्गत रु.२०००. ०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत आहे. संदर्भ क्र.२,३ व ४ अन्वये त्यामधून एकूण रु. ३११.२३२ लक्ष निधी यापूर्वी करण्यात आला असून, उर्वरित जिल्हा व तालुका संकुलाकरीता शिल्लक रु.१६०८.७६८ लक्ष तरतूदीमधून क्रीडा व युवक संचालनालयाने संदर्भ ६ अन्वये केलेल्या मागणीनुसार रु.२२.०० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u>:-

राज्यातील विभागीय / जिल्हा / तालुका क्रीडा संकुलाच्या देखभाल व दुरुस्तीकरीता मागणी क्र.ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा, (१६)(०३) जिल्हा क्रीडा संकुलांचे परिरक्षण (कार्यक्रमांतर्गत योजना), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-५३१२ या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खालील नमूद परिशिष्ट अ येथील १ जिल्हा क्रीडा संकुल आणि परिशिष्ट ब येथील ४ तालुका क्रीडा संकुलांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार परिरक्षणाकरीता एकूण रु.२२.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

**परिशिष्ट**

**(रुपयांमध्ये)**

| **अ) सन २०२३-२४ करीता जिल्हा क्रीडा संकुलाना वितरीत परिरक्षण अनुदान** | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | | जिल्हा क्रीडा संकुलाचे नाव | मंजूर एकुण अनुदान |
| १ | अमरावती | जिल्हा क्रीडा संकुल अमरावती | रू.१०,००,०००/- |

| **ब) सन २०२३-२४ करीता परिरक्षण निधी वितरीत केलेल्या संकुलांची यादी** | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र** | **जिल्हा** | **अ. क्र.** | **तालुका क्रीडा संकुलाचे नाव** | **तालुकानिहाय देय मानधन अनुदान** | **तालुकानिहाय मानधन अनुदान वजा जाता देय अनुदान** | **तालुका निहाय मंजूर एकूण अनुदान** | **जिल्हानिहाय मंजूर एकूण अनुदान** |
| १ | सातारा | १ | फलटण | १३२०००.०० | १६८०००.०० | ३०००००.०० | |
| | | २ | खटाव - वडूज | १२००००.०० | १८००००.०० | ३०००००.०० | |
| | | ३ | माण - दहिवडी | १२००००.०० | १८००००.०० | ३०००००.०० | |
| | | ४ | सातारा | १३४४००.०० | १६५६००.०० | ३०००००.०० | |
| | | | | **५०६४००.००** | **६९३६००.००** | **१२०००००.००** | **१२०००००.००** |
| | | | | **एकुण** | **१०००००+१२०००००** | | **रू. २२०००००.००** |

२. क्रीडा संकुलांना वरीलप्रमाणे परिरक्षणाकरीता /देखभाल व दुरुस्तीसाठी मंजूर निधी वितरीत करताना खालील बाबींची पुर्तता करावी:-

I. परिरक्षण/ देखभाल-दुरुस्तीसाठी मंजूर निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. निधी वितरणाबाबत वित्त विभागाद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले वित्त विषयक विविध आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय अधिकार नियमावली यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

III. वितरीत निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करण्यात यावे.

४. वरील बाबींवरील खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०३) जिल्हा क्रीडा संकुलांचे परिरक्षण (कार्यक्रम) (२२०४ ५३१२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग दिनांक १२.४.२०२३ आणि ४.३.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१५५/१४७१, दि.१८/३/२०२४ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.४१०/व्यय-५, दि.२७/३/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१८१७४८५४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: वरीलप्रमाणे.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F49 9D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.28 19:03:34 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई.

२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,

३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई
७) सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
९) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
१०) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव,
११) मा.मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव,
१२) मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
१३) अपर मुख्य सचिव (वित्त/क्रीडा-अ.का) यांचे स्वीय सहाय्यक,
१४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१५) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-१).